**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये दिनांक १ मे, २०१७ पासून "घनकचरा विलगीकरण मोहिम" (at source waste segregation) राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः स्वमअ २०१७/प्र.क्र.६०/ नवि-३४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
४ था मजला, मंत्रालय, मुंबई
दिनांक : २९ एप्रिल, २०१७

**पहा :**

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग,क्रमांक स्वभाअ २०१५/प्रक्र २३/नवि-३४, दिनांक १५ मे, २०१५.

२) केंद्रिय पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रालयाची दिनांक ८ एप्रिल, २०१६ ची अधिसूचना

**परिपत्रक :**

केंद्र शासनाच्या "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" च्या धर्तीवर संदर्भीय क्रमांक १ येथील दिनांक १५ मे, २०१५ च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरू झाली आहे. या अभियांनांतर्गत शहरे "हागणदारी मुक्त" करणे व घनकचरा व्यवस्थापनांतर्गत "स्वच्छ" करणे या दोन प्रमुख बाबींचा समावेश आहे.

२. या अभियानांतर्गत शहरे हागणदारी मुक्त करण्यासाठी शहरांमधील ज्या कुटुंबांकडे शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्याने जी कुटुंबे उघडयावर शौचास जातात, अशा एकूण ८.३२ लक्ष कुटुंबांना वैयक्तीक घरगुती शौचालय अथवा सामुदायीक शौचालयाद्वारे सुविधा उपलब्ध करून देवून शहरे हागणदारी मुक्त करावयाची आहेत. त्यानुसार, दिनांक १५ एप्रिल, २०१७ पर्यंत एकूण ३.६५ लक्ष वैयक्तीक शौचालयांची बांधाकामे पूर्ण झाली असून, सुमारे १.७५ लक्ष वैयक्तीक शौचालयांची बांधकामे सुरू आहेत. अशा रितीने राज्यातील २२५ शहरे हागणदारी मुक्त झाली आहेत.

३. शहरांमधील नागरिकांना स्वच्छ पर्यावरण व चांगले आरोग्य मिळावे या करिता घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ ची अंमलबजावणी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये प्रभावीपणे होणे अत्यंत आवश्यक आहे. या नियमातील तरतूदीनुसार प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरात निर्माण होणारा १००% कचरा निर्मितीच्या जागीच वेगवेगळा (at source waste segregation) (ओला, सुका, घरगुती घातक पदार्थ) करून स्वतंत्रपणे संकलित करणे, (ओला, सुका व घरगुती घातक पदार्थ यांची यादी सोबत परिशिष्ट-१ मध्ये देण्यात आली आहे.) या संकलित केलेल्या (ओला, सुका व घरगुती घातक पदार्थ) १००% कचऱ्याची वाहतूक करणे, ओल्या कचऱ्यावर केंद्रीत अथवा विकेंद्रित पध्दतीने जागीच प्रक्रिया करणे. तर, सुक्या कचऱ्याचे पुनर्वापराकरिता पुन्हा विलगीकरण करून त्यावर प्रक्रिया करणे व उर्वरित कचऱ्याची शास्त्रीय पध्दतीने विकसीत केलेल्या भरावभूमीवर विल्हेवाट लावून शहरे "स्वच्छ" करावयाची आहेत.

४. घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ नुसार वरील प्रमाणे कार्यवाही करण्यासाठी संबंधित शहरांचा घनकचरा व्यवस्थापनांतर्गत सविस्तर कृती आराखडा तयार करून त्यानुसार कार्यवाही करावयाची आहे. परंतु, सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून त्या सविस्तर प्रकल्प अहवालानुसार कार्यवाही करण्यास प्रत्येक शहरास काही कालावधी लागणार आहे. यास्तव, घनकचरा व्यवस्थापनांतर्गत कचरा निर्मितीच्या जागीच वेगवेगळा करणे (at source waste segregation) ही महत्वाची बाब आहे. घनकचऱ्याचे विलगीकरण केल्याशिवाय घनकचऱ्यास मुल्य प्राप्त होत नाही, हा आजपर्यंतचा अनुभव आहे. आता पर्यंत या क्षेत्रात उभारण्यात आलेल्या प्रकल्पावरून असे लक्षात आले आहे की, घनकचऱ्याचे विलगीकरण न करता त्यावर प्रक्रीया करणारे प्रकल्प यशस्वी होत नाहीत. ही बाब विचारात घेवून, घनकचरा निर्मितीच्या जागी विलगीकरण करण्याची मोहिम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

५. वरील परिच्छेदात केलेले विवेचन लक्षात घेता राज्यामधील सर्व शहरांमध्ये दिनांक १ मे, २०१७ पासून शहरामध्ये निर्माण होणाऱ्या घनकचरा निर्मितीच्या जागी विलगीकरण (at source waste segregation) करण्याची मोहिम राबविण्यास शासन मान्यता देत आहे. ही मोहिम प्रभावीपणे राबविण्यासाठी पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) कचरा विलगीकरण मोहिमेची अंमलबजावणी महाराष्ट्र दिना पासून म्हणजे दिनांक १ मे, २०१७ पासून करण्यात यावी. महाराष्ट्र दिना निमित्त शहरात होणाऱ्या कार्यक्रमात या माहिमेची सुरवात करावी.

२) या मोहिमेशी संबंधित असलेल्या सर्वांची कार्यशाळा १ मे, २०१७ पूर्वी घेवून या सर्वाना ओला कचरा (विघटनशील कचरा ) व सुका कचरा (अविघटनशील कचरा) वर्गीकरणाचे महत्व पटवून देवून त्या सर्वाचा सहभाग या मोहिमेसाठी मिळवावा. या मध्ये शहराचे महापौर, नगराध्यक्ष, नगरसवेक, घनकचरा व्यवस्थापनात काम करणारे पालिकेचे सर्व कर्मचारी, बचतगटाचे, शहरात कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्थांचे व युवक संघटनांचे प्रतिनिधी, महाविद्यालयाचे प्राचार्य, शाळांचे मुख्याध्यापक, रहिवाशी व बाजार संघटनांचे प्रतिनिधी, व्यवसायिक व औद्योगिक संस्थांचे प्रतिनिधी इत्यादींचा समावेश असावा.

३) शहरातील नागरीकांना या मोहिमेची माहिती व्हावी म्हणून शहरात होर्डींग्स, पोस्टर्स, बॅनर्स लावण्यात यावेत. Whatsup, facebook या सारख्या सोशल मिडियाचा वापर करण्यात यावा. पथनाटय व सामाजिक संस्था यांचे मार्फत शहरामध्ये प्रभावीपणे जनजागृती करण्यात यावी.

४) घनकचरा विलगीकरण मोहिम राबविताना जनजागृतीच्या प्रत्येक स्तरावर शासकीय आणि सार्वजनिक क्षेत्रातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना तसेच अशासकीय संस्था, शैक्षणिक व आरोग्य संस्था, स्वयं-सहाय्यता गट, युवक संघटना, रहिवाशी व बाजार संघटना, व्यवसायिक व औद्योगिक संस्था इत्यादींना सहभागी करून घेण्यात यावे.

५) सर्व वैयक्तिक कुटुंबे, समूह गृहनिर्माण संस्था, निवासी संकुले, निवासी कल्याण व बाजार संकुले, हॉटेल व उपाहारगृहे, दुकाने, कार्यालये, तसेच वाणिज्यक आस्थापनांमध्ये निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे विलगीकरण करण्याची जबाबदारी संबंधित कचरा निर्माण

करणाऱ्याची आहे. त्यांच्यावरील सदर जबाबदारीबाबत उपरोक्त सर्व संस्थांना/सर्वांना अवगत करण्यात यावे व त्यानुसार कचरा विलगीकरणाची कार्यवाही करण्यात यावी.

६) कचरा निर्माण होणाऱ्या प्रत्येक ठिकाणी ओला, सुका व घरगुती घातक कचरा यासाठी स्वतंत्र डबे ( Dust Bins) ठेवण्यात यावेत.

७) ओला, सुका व घरगुती घातक कचऱ्यासाठी ठेवण्यात येणारे स्वतंत्र डबे (Dust Bins) अनुक्रमे हिरव्या, निळ्या व लाल रंगाचे ठेवण्यात यावेत.

८) ओला, सुका व घरगुती घातक कचऱ्यासाठी ठेवण्यात येणाऱ्या स्वतंत्र डब्यांचा (Dust Bins) खर्च CSR निधीतून करण्यात यावा. यासाठी कोणत्याही परिस्थितीत स्वच्छ भारत अभियानांतर्गत प्राप्त निधीचा अथवा १४ व्या वित्त आयोगाच्या निधीचा विनियोग करू नये.

९) घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संस्थात्मक व व्यावसायिक आस्थापनांमध्ये निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे विलगीकरण करून देण्याची जबाबदारी संबंधित आस्थापनांची आहे. सदर जबाबदारीबाबत त्यांना अवगत करण्यात यावे व त्यानुसार कचरा विलगीकरणाची कार्यवाही करण्यात यावी.

१०) फेरीवाल्यांमार्फत पदपथावर / रस्त्यावर विक्री करताना निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे विलगीकरण करून साठवणूक करण्याची, तो कचरा प्राधिकरणाने अधिसूचित केलेल्या कचरा डेपोस किंवा कचरा गाडीस देण्याची जबाबदारी पदपथावर / रस्त्यावर विक्री करणाऱ्यां फेरीवाल्यांची आहे. सदर जबाबदारीबाबत त्यांना अवगत करण्यात यावे व त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

११) घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ मधील तरतूदीनुसार घातक नसलेला व विलगीकरण केलेला कचराच संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस देण्याची जबाबदारी औद्योगिक आस्थापनांची आहे. सदर जबाबदारीबाबत औद्योगिक आस्थापनांना अवगत करण्यात यावे व त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरातील बाजार, सार्वजनिक ठिकाणे, उद्याने इत्यादी ठिकाणावरील घनकचरा व रस्ते सफाई करण्यात आल्यानंतरचा ओला, सूका, घरगुती घातक, टाकाऊ भाजीपाला व फळे, रस्त्यावरील कचरा, नाल्यातील गाळ, बांधकामविषयक टाकाऊ पदार्थ इत्यादी घनकचरा, नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने विलगीकरण करून स्वतंत्रपणे संकलित करावा.

१३) **विलगीकरण केलेल्या घनकचऱ्याचे संकलन (Collection of Municipal Solid Waste):**

- शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याच्या संकलनाची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची आहे. त्यामुळे, प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरातील घनकचरा स्वतंत्ररित्या घरो घरी (Door to Door) जाऊन संकलीत करावा.
- सध्या ज्या शहरांमध्ये घरो घर जाऊन कचरा संकलीत करण्यासाठी पुरेशा वाहनांची व्यवस्था नाही अशा शहरांनी पुढील कलावधीत अशी व्यवस्था कार्यान्वित करण्यासाठीच्या उपाययोजना कराव्यात.

१४) **घनकचऱ्याची वाहतूक (Transportation of Solid Waste):**

- प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरात निर्माण होणारा ओला, सूका व घरगुती घातक कचऱ्याची वाहतूक बंदिस्त वाहनातून (Covered Vehicle) करावी. घनकचऱ्याचे संकलन व वाहतूक करण्यात येणाऱ्या गाडीमध्ये (घंटागाडी मध्ये) ओला आणि सूका तसेच घरगुती घातक कचरा स्वतंत्ररित्या संकलनाची व्यवस्था असावी अथवा त्याकरिता स्वतंत्र गाड्या असाव्यात.
- घनकचऱ्याचे संकलन व वाहतूक करण्यासाठी सध्या उपलब्ध असलेल्या वाहनांमध्ये ओला व सुका कचरा स्वतंत्ररित्या संकलनाची व्यवस्था करण्यात यावी.
- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरातील प्रत्येक घंटागाडीची वेळ व मार्ग निश्चित करावा. शहरातील प्रत्येक कुटुंबांस घंटागाडी निश्चित वेळी व निश्चित ठिकाणी येईल याबाबतची माहिती नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सूचना फलकावर लावावी किंवा प्रिंट अथवा इलेक्ट्रोनिक माध्यमातून माहिती देण्यात यावी. तसेच, घंटागाडीच्या वेळा व मार्ग दर्शविणारे नकाशे तयार करून प्रत्येक प्रभागात लावण्यात यावेत. प्रत्येक घंटागाडीवर नियंत्रण ठेवण्यांसाठी GPS यंत्रणा बसविण्यात यावी व त्याचे नियंत्रण केंद्रित पध्दतीने करावे. प्रभाग निहाय / घंटागाडी निहाय स्वच्छता दूताची नेमणूक करण्यात यावी.
- अशा प्रकारे घंटागाडीची व्यवस्था करण्यात आल्यानंतर शहरातील सार्वजनिक ठिकाणे वगळता रहिवाशी भागातील कचरा कुंड्याचे टप्प्याटप्प्याने उच्चाटन करण्यात यावे.

१५) **घनकचऱ्यावरील प्रक्रीया (Processing of Solid Waste)**:

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने संकलीत केलेला ओला, सुका व घरगुती घातक कचरा यांवर पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:

**(१५.१) ओला (विघटनशील (Biodegradible)) कचरा ( Wet Waste)** :

- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने संकलित केलेल्या ओल्या (विघटनशील) कचऱ्यावर शक्यतो शहरातच (In situ) विकेंद्रित पध्दतीने प्रक्रीया करण्यात यावी. ओल्या कचऱ्यावर विकेंद्रित पध्दतीने प्रक्रिया शक्य नसल्यासच केंद्रित पध्दतीने प्रक्रीया करण्यात यावी.
- सर्व निवासी संकुल आणि व्यापारी संस्था, संस्था, हॉटेल व उपाहारगृहे इत्यादी जैविक पद्धतीने नष्ट होणाऱ्या कचऱ्यावर शक्यतो कंपोस्टिंग अथवा बायो-मिथेनेशन पद्धतीने प्रक्रिया करण्यात यावी.
- ओल्या कचऱ्यावर कंपोस्ट, वर्मी- कंपोस्ट, बायो-मिथेनेशन इत्यादी विविध प्रकारे प्रकीया करता येते.
- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी संकलित केलेल्या टाकाऊ भाजीपाला व फळे, उद्यानातील कचरा इत्यादीवर शक्यतो त्याच आवारात प्रक्रिया करण्यात यावी.

(१५.२) **सुका कचरा (Dry Waste):**

- संकलीत करण्यात आलेल्या सुक्या कचऱ्याचे शहरातील ट्रान्सफर स्टेशन मध्ये अथवा पदार्थ पुनर्प्राप्ती सुविधा केंद्रावर (Material Recovery Facility Centre) विविध घटकांमध्ये

दुय्यम विलगीकरण (Secondary Segregation) करावे. (उदा. कागद, प्लास्टीक, काचेच्या व धातूच्या वस्तू इत्यादी.)

- वरिल प्रमाणे विविध भागामध्ये विलगीकरण केलेल्या कचऱ्याची शहरातील स्थानिक विक्रेते अथवा विभागातील पुनर्प्रक्रिया करणाऱ्यांना अथवा जवळपासच्या मोठ्या शहरातील प्रक्रिया उद्योगांना प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करून विक्री करावी.

(१५.३) <u>**घरगुती घातक कचरा (Domastic Hazardus Waste):**</u>

- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी घरगुती घातक कचरा संकलनासाठी २० किलोमीटर त्रिज्येच्या परिसरात केंद्र उभारावे व घरगुती घातक कचरा स्विकारण्याच्या वेळा कळवाव्यात. प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी घरगुती घातक कचऱ्याची सुरक्षित साठवणूक करून घातक कचरा विल्हेवाट सुविधा केंद्रापर्यंत सुरक्षित वाहतूक करण्याबाबत खात्री करावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२९१५४३४९१८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.04.29 15:47:49 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव ( सर्व), मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री सर्व विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग सर्व, मंत्रालय,
८. प्रधान सचिव (नगर विकास-१), मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त.
१३. सर्व जिल्हाधिकारी.
१४. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१५. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
१६. निवडनस्ती (नवि-३४).